सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने.
संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जिल्हा कोल्हापूर या प्रशिक्षण संस्थेस अनुदान वितरीत करण्याबाबत.
मुख्य लेखाशिर्ष-२५१५ ००२६
(पहिला हप्ता) (एप्रिल-मे, २०१५)

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः अनुसं-२०१५/प्र.क्र.८४/योजना-४

बांधकाम भवन, तळ मजला, २५, मर्झबान पथ,
फोर्ट,मुंबई- ४०० ००१.
तारीख: २ मे, २०१५.

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र. ८४५/०९, दि.१७.०९.१९९३.
२) शासन परिपत्रक क्रमांक- ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक- प्रशिक्षण ११९९/प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३.९.१९९८.
३) शासन परिपत्रक क्रमांक-ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक- प्रशिक्षण-२०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.

**शासन निर्णय**

सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरीता २५१५, इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, ००३- प्रशिक्षण, ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०२) श्री मौनी विद्यापीठाच्या विद्यमाने गारगोटी येथे संयुक्त प्रशिक्षण केंद्राची स्थापना करण्याची योजना (सांकेतांक क्र.२५१५ ००२६), (योजनेत्तर)(दत्तमत)( मागणी क्र. एल -३) अंतर्गत संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जिल्हा कोल्हापूर यांना वेतनेतरसाठी रुपये १०.०० लक्ष व वेतनासाठी रुपये ६७.७७ लक्ष असे रुपये ७७.७७ लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

२. सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाच्या एप्रिल-मे,२०१५ या कालावधीकरिता वेतनेतरसाठी रु.१.६६ लक्ष व वेतनासाठी रु. ११.३० लक्ष असे एकूण रु.१२.९६ लक्ष इतके अनुदान उपलब्ध करुन दिले आहे. सदरहू अनुदान संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जिल्हा कोल्हापूर यांना एप्रिल-मे, २०१५ या कालावधीकरिता या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत आहे.

३. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण- ११९८/प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने उपायुक्त (आस्था), पुणे विभाग, पुणे यांनी सदर प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भात दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

४. हा खर्च मागणी क्र.एल-३,"२५१५ इतर ग्रामविकास कार्यक्रम" ००३ प्रशिक्षण ०१(०२) श्री मौनी विद्यापीठाच्या विद्यमाने गारगोटी येथे संयुक्त प्रशिक्षण केंद्राची स्थापना करण्याची योजना (संकेतांक क्र.२५१५ ००२६) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) ३६, सहाय्यक अनुदाने (वेतन) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो यावर्षी त्या लेखाशिर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच उपलेखाशिर्षाखाली पडतो आहे याबाबतचा ताळमेळ घालून त्याचा एकत्रित अहवाल विभागीय आयुक्तांनी शासनास सादर करावा.

५. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रांस अनुदान वितरीत करताना वेतन व वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतनेतर व वेतनाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे. याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतनाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

६. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वंतत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य त-हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र / संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

७. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १५/५/२००९ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. १ परि. १६२, १६३, १६४ नुसार प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून व वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१५/प्र.क्र.८२/ अर्थसंकल्प-३, दि.३० मार्च, २०१५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५०२११४९१६०६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Bhagawan Bayaji Mahale

Digitally signed by Bhagawan Bayaji Mahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagawan Bayaji Mahale
Date: 2015.05.02 15:22:56 +05'30'

( भ. ब. महाले )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत,
१. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे (दोन प्रती)
२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे (नोंदणीकृत डाकेने)
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई. (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर. (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
५. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
६. संचालक, श्री.मौनी विद्यापीठ गारगोटी, जि.कोल्हापूर
७. प्राचार्य, संयुक्त प्रशिक्षण केंद्र, गारगोटी, जि.कोल्हापूर(२ प्रतींसह)
८. वित्त विभाग (का.क्र.अर्थसंकल्प-१७/व्यय १५)
९. कार्यासन.क्र. वित्त-१, वित्त-७, वित्त-८ ग्राम विकास व जलसंधारण विभाग (२ जादा प्रतींसह)
१०. निवड नस्ती का.क्र.योजना-४